**गुप्त (Secret)**

**शासकीय सेवेत नियुक्त केलेल्या व्यक्तींचे चारित्र्य व पूर्वचरित्र यांची तपासणी.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

परिपत्रक क्रमांक म्हासीए. १०८२/१६८१/सीआर-४०/१६-अ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २७ एप्रिल १९८२

**परिपत्रक**

शासकीय सेवेत सन १९७७ व १९७८ मध्ये सर्व विभागांत आणि कार्यालयांत वर्ग १, वर्ग २ आणि वर्ग ३ मध्ये ज्या व्यक्तींची सरळसेवा प्रवेशाने (by nomination) नेमणूक करण्यात आली आहे त्या सर्व व्यक्तींचे चारित्र्य व पूर्वचरित्र (character and antecedents) नियुक्तीपूर्वी तपासले होते किंवा नाही हे सर्व विभागप्रमुखांनी कृपया पहावे. ज्यांच्या बाबतीत चारित्र्य आणि पूर्वचरित्र यांची तपासणी झाली नसेल त्यांच्या चारित्र्याची आणि पूर्वचरित्राची, पोलीस अधीक्षकांमार्फत तात्काळ गोपनीय चौकशी करण्यात यावी.

२. तपासणीअंती ज्या व्यक्तींचा जातीयवादी संस्था, संघटना किंवा चळवळ यांच्याशी पूर्वसंबंध होता किंवा सध्या संबंध आहे अशा व्यक्तींची नावे त्यांच्या नियुक्तीसंबंधी व सध्याच्या पदस्थापनेसंबंधी माहितीसह आणि पोलीस खात्याच्या, त्यांच्यासंबंधी अहवालासह विभागप्रमुखांनी मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे पुढील कार्यवाहीकरिता तात्काळ पाठवावी अशी त्यांना विनंती करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स. का. ढेके,

शासनाचे उप सचिव.

H 13

[ मागे पहा

प्रति रवाना---

राज्यपालांचे सचिव,

मुख्य मंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री/राज्यमंत्री/उपमंत्री यांचे स्वीय सहायक,

शासनाचे सर्व सचिव,

*प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, हायकोर्ट, मुंबई,

*निबंधक, हायकोर्ट, अपिलेट साईड, मुंबई,

*निबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे, नागपूर, नाशिक, औरंगाबाद, ठाणे, अमरावती, पुणे,

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख,

सर्व मंत्रालयीन विभाग.

---

* पत्राने.